।। श्री स्वामी समर्थ ।।

# पितृदोष निर्माण होण्याची कारणे:-

१ अलीकडे प्रेतांना मंत्रविरहित असा भडाग्नी दिला जातो. शास्त्रोक्त विधिने अंत्येष्ठी- दशांतक्रिया न होणे. त्यात त्रुटी राहत आहेत.

२ वार्षिक नैमित्तीक श्राध्दादि कर्माचा लोप होत आहे.

३ (अ)मागील पिढीत कोणी पूर्वज कोणाचा खूप तळतळाट-शाप घेऊन मृत्यु पावणे.

३(ब) वंशा बाहेरच्या प्रेतात्म्याचा त्रास पितृदोष समान असु शकतो

४ दुर्मरणाने मृत्यु येणे. (पुढे व्याख्या आहे)

५.वंशबुडी

६.माहेरुन आणलेला पितृदोष

७.अघोर मांत्रिकाचे सहाय्य घेतल्यामुळे निर्माण होणारा पितृदोष.

८.आत्महत्या महापाप.

९. नागाचा सापाचा वध करणे - आपण किंवा आपल्या मागील पिढीत कुणी पूर्वजांनी नागा-सापाचा वध केला असेल तर.

वरील कारणामुळे प्रेतात्म्यांच्या वंशजास-कुटुंबास त्यांचा भयानक उपद्रव सुरु होतो.

## अघोर मांत्रिकाचे सहाय्य घेतल्यामूळे निर्माण होणारा पितृ दोष :

ज्या व्यक्तिने आपले जीवन दुष्ट करणीच्या मार्गाने, पिशाच्चांना किंवा अघोर शक्तिंना वश करुन घालवले आहे, अशा व्यक्ति मृत्यूनंतर प्रेतयोनीत जातात व अति दारुण नरकयातना भोगतात.

त्यांचा प्रेतयोनीचा कालही दीर्घ असतो कारण त्यांची भयंकर पापे त्यांच्या सद्गतीच्या आड येत असतात. **तेव्हा आपल्या भयानक संकटातही अशा मांत्रिकाचे सहाय्य चुकूनही घेऊ नये. घेतल्यास आपणही प्रेतयोनीत जाण्याची तयारी करत असतो**. असा प्रेतात्मा त्यांच्या पुढील पिंढींना भयानक घातक ठरतो.

# वंशबुडीची गंभीर कारणे;-

मागील काही पिढ्यात श्राध्दकर्माचा लोप - पितरांचे विस्मरण झालेले असते. त्यामुळे अनेक पिढ्यांपासून प्रेतात्म्यांचा क्रोध वाढत जातो. त्यांच्या क्रोधाची परिसीमा होते.

यामुळे ते चिडतात व स्वत;चाच वंश संपविण्यापर्यंत त्यांची मजल जाते.

क्रोधाने त्यांनी वंश खुंटविला तरी त्यांची प्रेतयोनि काही सुटत नाही.

काही वेळेला वंशाला फक्त मुलीच असतात अगर पुत्र संतती अचानक जाऊन फक्त मुलीच राहतात.

त्यामुळे त्या कुटुंबाचे संबंध जिथे जिथे घडलेले असतील तिथे तिथे त्यांच्या उपद्रवाचे उपद्व्याप चालूच राहतात. वंशबुडीची मालमत्ता ज्यांच्याही नावे आली असेल व जो उपभोग घेत असेल त्या दोन्ही व्यक्तींच्या कुटुंबाला वंशबुडीच्या प्रेतात्म्यांकडून खुप त्रास होवू शकतो मग ती मालमत्ता इस्टेट असो की जमीन असो.

## माहेरून आणलेला पितृदोष

सर्वसामान्यपणे पुत्र, कन्या असलेल्या कुटुंबातील मुलगी सासरी जाताना माहेरच्या घराण्याचा ५० टक्के दोष-पुण्य जे काही असेल ते घेऊन जाते. पण जर फक्त मुलीच असतील तर पितृदोषाचा`बहुतांश प्रवाह ज्या कांही ३ - ४ मुली असतील त्यांच्याकडे वाहत राहतो. त्याचे परिणाम प्रत्येक मुलीवर कमी जास्त घडू शकतात.

### परिणाम;-

कोणाकोणाला पुत्रसंतती होत नाही.
पती व्यसनाधीन होऊ शकतो. त्याचा स्वभाव रागीट बनतो. पुत्रसंतती झालीच तर तोही व्यसनाधीन, कोपिष्ट होऊ शकतो.
संसाराचा गाडा विस्कळीत होतो. दिर्घ आजार बळावू शकतो.अकाली वैधव्य येऊ शकते.
अपत्यांच्या स्वभावात विचित्रपणा, प्रगतीत अनपेक्षीत अडथळे येऊ शकतात.

| माहेरचा पितृदोष | | सासरचा पितृदोष | | होणारा त्रास |
|---|---|---|---|---|
| अल्प | + | अल्प | ⟶ | मर्यादीत |
| जास्त | + | अल्प | ⟶ | सौम्य |
| जास्त | + | जास्त | ⟶ | गंभीर |

## उपाय :-

सासरी आलेल्या मुलीने जर मातृगया येथील विधी करून घेतला तर माहेरून आणलेला पितृदोष निवारण होतो.सासर बरोबर माहेरच्या हयात व्यक्तिकडुन नारायण नागबळी हा विधी केल्यास सासरचा व माहेरचा (दोन्ही कडील) पितृदोष निवारण होऊन पुर्ण फळ मिळु शकते.

### वंशा बाहेरच्या प्रेतात्म्याचा त्रास पितृदोष समान असु शकतो

**मागील पिढीत कोणी पूर्वज कोणाचा खुप तळतळाट-शाप घेऊन मृत्यु पावणे.**

समजा आपल्या पिढीतील दुष्ट पापी व्यक्ती = x

ज्या व्यक्तीने तळातळाट, शाप दिला आहे ती व्यक्ती=y

’x' ने 'y'चा दुष्ट बुद्धीने धननाश केला असेल अथवा अन्य प्रकारे घोर दु;ख दिले असेल तर 'y' व्यक्तीचा प्रेतात्माही ’x'  च्या वशंजाना त्रास देऊ शकतो.

’x' व्यक्तीचा प्रेतात्मा स्वतःच्या वंशजाना पूर्वीपासून त्रास देत असतो.

वरील दोन्ही प्रेतात्मे (’x' आणि 'y') सद्गती वाचून नरक यातना भोगीत असतात.
अशा एक किंवा अनेक व्यक्ति - प्रकार असू शकतात.
आपल्याला गेल्या चार पाच पिढीतील सर्वतोपरी माहिती नसते.तेंव्हा ’x', 'y', 'z', A,B,C,
अशा एक किंवा अनेक व्यक्ती - प्रकार असु शकतात.

**कुटूंबास दिल्या जाणाऱ्या बाहेरच्या प्रेतात्म्यांच्या त्रासातून मुक्त होण्यासठी NNB विधिइतका सुलभ मार्गच नाही. नित्याच्या श्राद्धविधिने वंशाबाहेरच्या त्रास देणा-या प्रेतात्म्यांची शांती करता येत नाही.**

### आत्महत्या-महा पाप

आत्महत्या करणे हे फार मोठे महापाप आहे. या मुळे अति क्लेशदायक प्रेतयोनी लाभते. जन्माला आलेला जीव हा प्रारब्धाच्या बंधनात असतो. तेंव्हा हा जीव आत्महत्या करुन या बंधनातून कूठे पळुन जाईल? संपूर्ण विश्वच कर्माच्या आधीन आहे.

दुसऱ्या योनीत तर हे शेष प्रारब्ध त्या जीवास भोगावेच लागते. या विश्वाच्या कर्म नियंत्या जवळ प्रदान करण्यास अनेक शरीरे आहेत. कदाचित तो कर्मनियंता आत्महत्येने अकाली शरीर नाश केल्यामुळे निकृष्ट शरीर प्रदान करेल.

जेल मधून कैदी पळाला तर त्यास सवलती काढून घेवून, आणखी वाढीव सजा दिली जाते.त्याच प्रमाणे आत्महत्या करणाऱ्या जीवाचे बाबत घडते.

प्रारब्ध हे भोगूनच संपविणे शहाणपणाचे व अंति जिवाच्या हिताचे असते.

## पितरांची विविध प्रकारे सेवा का करावी ?

### कांही सेवेकरी विचारतात, आम्ही तर सर्व नैमित्तिक श्राद्ध विधी करतो ना !

### श्राद्धाची पात्रे वाढतो ! मग आम्हाला कसला हा पितरबाधा दोष?

सर्वसामान्य मृतात्म्यांना या सर्वसामान्य नैमित्तिक श्राध्दाव्दारे सद्‌गति मिळालेली असते परंतु आपल्या काही मागील पिढित श्राद्धाचा लोप झाला काय? हे ही आपल्याला माहित नसते.

तेव्हा अशा सर्व संबंधित प्रेतात्म्यांना सद्‌गति देऊन त्यांचा त्रास टाळण्यासाठी, सकाम श्राद्धे इ. करणे आवश्यक ठरते.

आपण त्या पितरांचेच रक्ताचा अंश आहोत ना !

हे श्राद्धविधिही परोपकारी ऋषिमुनींनी निरपेक्ष भावनेने, केवळ मानवाच्या हितासाठी अथक प्रयत्नानी संशोधित केलेले आहेत.

***मृत पितर देव झाला असेल तर आपण केलेल्या शुभ अशा श्राद्धकर्माने दिलेले अन्न त्यास भोगरुपाने मिळते. जर तो पशु झाला असेल तर तृणरुपाने मिळते. प्रेत झाला असल्यास रुधिर रुपाने मिळते.***

मनुष्य झाला असल्यास अन्नपानादि रुपाने मिळते.

आपले काही पितर मृत्यूनंतर सद्‌गती प्राप्तीस पात्र न ठरता पिशाच्च योनीत अथवा वेग-वेगळया प्रकारच्या प्रेतयोनी मध्ये अडकून पडलेले असतात.तर काही पितर पशूरूपात, मनुष्यरूपात परंतु अत्यंत हलाखीच्या परिस्थितीत दिवस काढत असतात.

शेवटी जन्म घेतल्यानंतर पितृऋण हे प्रत्येक जीवाला स्वतःचे मुत्युपूर्वी फेडणे त्याचे कर्तव्य ठरते, नाहीतर त्या जीवाचा मरणोत्तर परलोकही बिघडतो.

शिवाय पितृदोष अनेक कुटुंबात मागील अनेक पिढ्यांपासून चक्रवाढ व्याजासारखा वाढत चाललेला असतो.

पृथ्वीतलावरील सर्व सुखसंपत्तिचे संचालक व कुलाचे नित्य रक्षक पितर हेच आहेत.पितरांच्या संतुष्टतेने मानवास आयुष्य, किर्ती, बल, तेज, धन, पुत्र, संसारसुख, आरोग्य, सन्मान इत्यादी ऐहिक गोष्टी प्राप्त होतात. ः

**प्रथम पितरांचे आशिर्वाद नंतर कुलदैवत, कुलदेवी व नंतर इष्टदेवतेची कृपा असा क्रम आहे.**

जर पितरांचे आर्शीवाद नसतील तर आध्यात्मिक प्रगती होत नाही व इष्ट देवतांची कृपा प्राप्तीही होत नाही. व ख-या अर्थाने स्वामी महाराजांचा कृपा आर्शिवादही मिळू शकत नाही.

***प्रारब्धात /कुंडलित असलेल्या राजयोगाचा लाभ, कुंडलीतील शुभ ग्रहांमुळे प्राप्त होणारे फल (दोन्हीही ८० टक्के पर्यंत) भयंकर पितृदोष असलेल्या व्यक्तीस पूर्णपणे प्राप्त होत नाही.***

जेंव्हा काही अघोर पितरांना, प्रेतात्म्यांना सद्गती मिळत नसते तेंव्हा अत्यंत रागाने त्यांच्या मुखातून क्रोधजन्य अग्नि उत्पन्न होतो.

प्रखर पितृदोषामुळे राहत्या घरावर पितरांची अशुभ छाया नित्य राहते.

कालसर्प दोष पण पितृदोषाचा प्रकार आहे. वयाच्या २४ वर्षानंतर कालसर्प दोष राहत नाही. काही समाजात किंव धर्मात कालसर्प दोष मानत नाहीत.

त्या कुटुबांत नित्य काही दु;ख, अस्वस्थता राहते.

## कार्यकारण भाव समजत नाही.

***त्यामुळे खुप देव-देव, गंडोदोरे करुनही परिणाम दिसत नाही. तेव्हा ईश्वरावरील श्रद्धेलाही तडा जायला सुरुवात होते व ते कुटुंब दु;खाने व निराशेने अधिक खचते व मुळ कारणाचा शोध-बोध लागत नाही.***

प्रेतात्मे हे असुर योनिसमान असतात. ***सर्वसामान्य नित्य ईश्वरी उपासनेने (३ अध्याय व ११माळी, नित्य दर्शन, एखाद्या आरतीला कधीकधी उपस्थित राहणे, सेवा केल्यासारखे दाखवणे वगैरे वगैरे),*** **पितरांचा त्रास कमी झाला असे वाटले तरी त्याचे पूर्ण निर्मूलन होत नाही.** ***पण नित्य ईश्वरी उपासनेचा फयदा असा की भक्तास पितृदोष कसा निवारण करावा, अडचणींचे निरसन कसे करावे, या बद्दल अप्रत्यक्ष मार्गदर्शन मिळते.*** कारण निदान सुरुवातीला तरी ईश्वरी शक्तिपेक्षा या असुरी शक्ति जास्त बलवान ठरतात. अखंड उपासनेने शेवटी ईश्वरी शक्तिचाच शाश्वत विजय होतो.

ईश्वरी ''कर्मफल'' नियमाप्रमाणे, प्रेतात्मेही नरक अथवा सद्गतीचे भोग भोगत असतात. ''ईश्वरी कर्मफल शक्ति'' प्रत्येक वेळी कर्मफल नियमात हस्तक्षेप करत नाही. पण एखाद्या वेळेस महाराज एखाद्या सेवेक-याचे एखादे महत्वाचे काम करतीलही, पण हे घडले ते अपवादानेच.

जर ईश्वर स्वतः केलेले नियम स्वतः नेहमी मोडू लागला तर या सृष्टीचा खेळच थांबेल. अति अपवादाने भक्त पूर्ण शरणागत झाल्यावर ईश्वरी करुणेतून असे कर्मफल नियम मोडले जाऊ शकतात. अगदी पूर्ण ४२ पिढ्याही दोषमुक्त होऊन सद्गतीस जाऊ शकतात.

**जेंव्हा घरात शांतिचे वातावरण नसते व पितरांचा अशुभ प्रभाव खुप असतो तेंव्हा पितृदोष निवारण्याकरीता संकल्पयुक्त अनुष्ठाने , पारायणे, जप, दान, नैमित्तिक श्राद्धे आपण घडवून आणू शकत नाहीत, अगदी सामूहिक सेवेतही बसु शकत नाहीत.**

१) आपली अडलेली सर्व कामे होण्याकरीता ''पितरांचे आशिर्वाद व त्यांचे नाहरकत प्रमाणपत्र'' अत्यंत आवश्यक असते.

***२) सकाम श्राध्दाद्वारे आपल्या जवळ असलेले पुण्य आपल्याला त्यांना दान करता येते.व हेच पुण्य मिळवण्या करीता स्वामींची सेवा करावी लागते.***

३) आपण दान केलेल्या पुंण्याच्या जोरावर त्यांना सद्गती मिळुन त्यांचा पितर लोकात प्रवेश होवू शकतो.

**४) सद्गतीस जाताना त्यांच्या मनाची तयारी असो वा नसो, त्यांना आपणास आशिर्वाद देणे भाग असते.**

५) अशा सर्व पितरांच्या मुक्ती करिता,''पुण्याचा संचयित साठा'' हा अतिशय भरपूर मोठया प्रमाणात मनुष्य प्राण्याकडे असणे अतिशय आवश्यक आहे.

६) ***जर आपल्याकडे काही अघोर पितरांना सद्गती मिळवून देण्यासाठी तेवढा पुण्यसाठा नसेल तरी सकाम श्राद्धाद्वारे प्रखर पितृदोषाची भयानकता कमी होते.***

सकाम श्राद्धे करुन प्रखर पितृदोषाची भयानकता कमी करणे हा सर्वश्रेष्ठ व शीघ्रतम उपाय आहे. हे सर्व झाल्यानंतर अखंड जप, हवन, पारायणे, नैमत्तिक श्राद्ध, सामूहिक सेवेत भाग इत्यादी मार्गाने पितृदोष पूर्णतः निवारण करता येतो.

***वेगवेगळया कारणामुळे ९० टक्के पेक्षाही जास्त कुटुंब कमी अधिक प्रमाणात पितृबाधेने पीडित आहेत.***

पितरांचे आशिर्वाद मिळाल्यानंतर वंशजांची भरभराट सुरु होते हां केवळ शास्त्राधार नसून हजारो सेवेक-यांचे सत्य अनुभव आहेत.

***म्हणूनच असे म्हणतात की श्रीमंतीत जन्माला येण्यापेक्षा ज्या घराला पुण्यवान पितरांचे आशिर्वाद आहेत, अशा घराण्यात जन्माला येणे महत् भाग्याचे व परम सुखशांतीचे असते.***

तेव्हा पितृदोष हां विषय बराच गुंतागुंतीचा व गहन आहे.

***मग आपणास अनेक वर्षांनी त्रिपिंडी, नारायणनागबळी ही सकाम श्राद्धे करायला सांगितली तर त्यासाठी वादविवाद-शंका कशासाठी ?***

**सत्य हे आहे की पितरांच्या कृपाप्राप्तीचे व ईश्वराच्या कृपाप्राप्तीचे मार्ग भिन्न आहेत.**

***या सर्व कारणांमुळे भीष्माचार्यांनी धर्मराजास स्पष्टपणे सांगितले आहे की, ''पितृकार्य हे देवकार्यापेक्षा श्रेष्ठ आहे.''***

सर्व सामान्य पितरांना, अघोर पितरांना, प्रेतात्म्यांना पुढे जाण्यासाठी, सद्गतीसाठी मंत्रचावी त्यांच्या इहलोकीच्या वंशजाकडे म्हणजे आपल्याकडे असते

म्हणून एकदा कार्यक्रम घेतला की विधी तातडीने करणे आवश्यक आहे. त्यामुळे भावी आर्थिक व काळाचाही अपव्यय तसेच भावी संकटेही टळू शकतात.

***प्रखर पितृदोषाचा माणुस सहजासहजी नारायण नागबली करण्यास तयार होत नाही.***

त्याला खूप प्रकारे समजावून सांगून विनवण्या कराव्या लागतात. त्यातून तो तयार झाला तर त्याला अनेक विघ्ने या विधिसाठी जाण्याच्या नियोजनात येतात. कारण त्यांचे पितर खुप वर्ष नरकवास भोगून चिडलेले असतात. त्यांच्या ठिकाणी प्रखर सुड्ाची व क्रोधाची  भावना असते.

**NNB विधिनंतर त्या प्रेतात्म्यांना सद्गतीस जातेवेळी कर्त्यास आर्शिवाद देणे भाग असते. याबाबत तसे करण्यास त्यांच्या मनाची तयारी नसते.**

**तेव्हा अशा माणसांना सर्व प्रकारे प्रयत्न करुन या विधिसाठी तयार करून पाठविणे योग्य ठरते.**

***श्री स्वामी समर्थ सेवा कार्यात मार्गदर्शनासाठी व्यक्ति बहुतांश इतर सर्व प्रकारचे तोडगे उपासना करून निराश झाल्यावर व व्यवहारिक दृष्ट्या सर्व बाजूंनी कोंडी झाल्यावर येतात, असा अनुभव आहे.***

ज्या प्रमाणात पितृदोषाचा परिहार झाला असेल त्या प्रमाणात मानसिक स्वास्थ्यलाभ व आत्मविश्वास प्राप्ती लागलीच लाभते. अगदी चोवीस तासातच मानसिक अवस्थेत शुभकारक फरक पडतो. ईश्वर सेवा, उपासना करायला उत्साह व एकाग्रता लाभते.

***संपूर्ण फलासाठी सासर बरोबर हा विधि पत्नीच्या हयात माहेरकडील व्यक्तिकडून करून घ्यावा. त्यामुळे पत्नीचे माहेरून आणलेला पितृदोष निवारण होईल.***

# ***पितृ दोषाची लक्षणे***

प्रखर पितृ दोषामुळे रोज दुपारी कावळे घरासमोर काव काव करुन जातात. त्या कुटुंबात नित्य काही उलटेच घडत राहते. शेजाऱ्यांशी,नात्यागोत्यांशी संबंध अकारण दुरावतात. कुटुंबातील जेष्ठ व्यक्तीला अकारण डोकेदुखी, भयग्रस्त व उदास होणे, ह्दयात काही वेळा अकारण धडधड होणे, रात्री झोप अडीच तीन पर्यंत न लागणे, लागली तर एका एकी दडपल्या सारखे होवून दचकून जागे होणे, नंतर लवकर झोप न लागणे, स्वप्नांनी घेरणे, काही वेळा मृत व्यक्ती स्वप्नात येवून जाग येणे असे प्रकार घडतात. संततीस सुख लाभत नाही. संततीचे आरोग्य, शिक्षण या बाबत अडचणी निर्माण होतात, विस्मरणामुळे मुलांची अभ्यासात प्रगती मंदावते, मुले काही वेळा हेकट विचित्र वागून कुसंगतीत जाण्याची शक्यता राहते. काही वेळा घरातील कोणी परागंदा होते, काही कुटुंबात पुत्रसंतती होत नाही.गर्भपात होणे - झालीच तर ती न जगणे- अकाली मृत्यु होणे - फक्त मुलीच

होणे. काही वेळा वेडसर - अपंग-मंदबुध्दीची संतती जन्मास येणे, संततीचे अभ्यासात लक्ष एकाग्र न होणे, संततीच्या विवाहात अनपेक्षित अडथळे येणे, संततीचा विलंबाने विवाह होणे, मुली पळुन जाणे, मुलीने कनिष्ट जातीशी अंतरजातीय विवाह करणे, तरुण मुलींना विलंबाने मासिक पाळी येणे, मासिक पाळी अत्यंत अनियमीत किंवा मुळीच न येणे, घरात नित्य शुल्लक कारणावरुन भांडण-वादविवाद होणे, भांडण्यात जेवण्याचे ताट बाजूला सारणे, रोज घरात चिडचिड - अस्वस्थता - उदासिनता राहणे,शेती उत्पन्नात अकारण घट, नोकरी व्यवसायात खोटे आळ येणे, धंद्यात दिवाळे वाजणे, भयानक आर्थिक तोटे, कर्जबाजारीपणा, आर्थिक चणचण , अकारण पत्नीचा त्याग, योग्य प्रयत्न करुनही अपयश, कुटुंबात डॉक्टरला निदान न होणारे शारिरीक व मानसिक आजार नित्य, घरात करणी- भानामती- पिशाच्च बाधा यांचा त्रास, घरात कशातच बरकत नसणे - पुरवठा न पडणे, गोठ्यातील जनावरांचा अकस्मात मृत्यु, घरातील जेष्ठ व्यक्तीचा स्वभाव चिडचिडा - नास्तीक अगर व्यसनाधीन होणे, कुटुंबात धार्मिक विधीचा लोप होणे, नैतिक अधःपतन घडणे, घरातील एखाद्या व्यक्तीच्या अंगात प्रेतात्म्याचा अगर कनिष्ठ दैवतांचा संचार येणे इत्यादी प्रकार घडतात. थोडक्यात घराची कळाच निघून जाऊन एक बोजा वाटायला लागतो.

## स्वप्न व पितृदोष यांचा संबंध

प्रखर पितृदोषाने -वंश दोषाने - नागदोषाने अनेक अशुभ शाप सुचक स्वप्ने पडतात. नदी-तलाव- विहीर यांचे पाणी दिसणे, पाण्यात बुडतांना भयग्रस्त अवस्थेत स्वतःस पाहणे, पाण्यात नावेतून कुठे भयानक ठिकाणी जातोय असे स्वतःस पाहणे, भांडण दिसणे, भांडणात आपण भाग घेतलेला दिसणे, विधवा अगर सधवा दिसणे, मृत नातेवाईक दिसणे, मृताचे संस्कार कार्य, लाकडे-गोवऱ्या दिसणे, खुप अडचणीतून खोल दरीच्या वर डोंगरावर चढतांना भयग्रस्त अवस्थेत स्वतःस पाहणे, घर कोसळतांना पाहणे, झाडाला फळे दिसणे, नाग दिसणे, नागाला मारणे, नागाचे तुकडे झालेले पाहणे, रात्री घरात कुणी अदृष्य शक्ती वावरत आहे असा भास होणे, भावी जीवना विषयी निराशा व भयानक चिंता वाटणे, आत्महत्येचा विचार मनात येणे.

**स्वप्नात पाणी, पंक्तीत जेवण, नाग (काळा, पांढरा, चॉकलेटी); विधवा, प्रेत, डोंगर, आकाशात उडणे, कुंडलीत केंद्रस्थानी राहू केतू असणे, हे प्रखर पितृदोषाचे लक्षण जाणावे.**

## ***''दुर्मरण''***

वरती काही ठिकाणा दुर्मरण म्हंटले आहे. याचा अर्थ मागील किंवा या पिढीतील मृत्यु पाण्यात बुडुन - सर्प दंशाने- अपघाताने- आत्महत्येने - खुनामुळे-देशांतरी-एन तारुण्यात - अकस्मात - विजेच्या धक्क्याने - अग्नीत जळून- हत्याराने- गळा दाबून- घशात घास अडकवून- व्यसनाधीनतेत - बाधेने - क्षय रोगाने -कॅन्सरने - अर्धांगवायुने- कुण्या सज्जनाचा तळतळाट घेवून-बालहत्या घडून- स्त्रीहत्या घडून - गोहत्या घडून- प्रेतक्रिया दशांत सपिंड न होणे इ. अनेक कारणांमुळे प्रेतात्मा प्रेत योनीत अडकून पडतो व नरक यातना भोगतो व नंतर सद्गतीसाठी वंशजांना त्रास देतो. थोडक्यात संसारीक आसक्ती, ईर्षा, द्वेष, मत्सर व दुर्मरण यामुळे जीव प्रेत योनीत अडकुन पडतो.

जन्मलग्न अगर राशी कुंडलीत, पंचमात अगर नवमांत केतू, अष्टमात अगर द्वादशांत गुरू अगर पिडीत रवि अगर चंद्र हे प्रकाशीत ग्रह. कुंडतील रवि केतूने पीडित, गुरु राहुने पिडीत इ. लक्षणे पितृदोष दर्शवितात.

हातावर शुक्रावरील मंगळ रेषांना छेदणा-या खोल आडव्या रेषा, गुरूवर एक अगर अनेक चौकोन हे पितृदोषदर्शक असतात.प्रखर पितृदोषामुळे चेहरा अनाकर्षक होतो.डोळयांचा खालील भाग व खालील ओठ निस्तेज अगर काळसर होतात.

अमावस्येला एक दिवस अगोदर किवा एक दिवस नंतर आगेमागे राहत्या घरी एक प्रकारची हुरहूर, उदासीनता, अस्वस्थता जाणवते.

## घरच्याघरी करावयाची श्राध्दे

''श्राद्धाच्या वेळी म्हणावयाचा संस्कृत मंत्राचा भावार्थ''

''तुम्ही या ऐहिक जगाकडे लक्ष न ठेवता पुढील मार्गाकडे लक्ष द्या. या लोकीचा तुमचा संबंध तुटला आहे. तुम्ही या जगाची वासना सोडून दयावी. तुमच्या श्रेय व मोक्ष यासाठी तुम्हाला आम्ही स्मरण देत आहोत.''

त्यामुळे समंत्र विधिवत श्राद्धे यांनी त्या प्रेतात्म्यांना गती मिळून ते पितरलोकात प्रवेश मिळवून सद्गती पावू शकतात व यथाकाळ पुनर्जन्मही घेऊ शकतात.

पितृपक्षात पितरांचा निवास पुत्राच्या घरी असतो.प.पु.गुरुमाऊली असे सांगतात की, पितृ पक्षात त्र्यंबक किंवा मातृ गया येथील सकाम श्राध्द करु नयेत.

घरचे श्राध्दविधी स्वत;च करावयाचे असतात. सुरुवातीस मंत्रोच्चारासाठी ब्राह्मणाला बोलावलं तरी चालेल.

# नारायण नागबळी विधी कोणी, कोठे, केंव्हा आणि कोणासाठी करावा.?

नारायणनागबली हा काम्य श्राद्ध विधी फक्त श्री क्षेत्र त्र्यंम्बकेश्वरीच फलप्रद होतो.

हा विधी विवाहितांना व अविवाहितांना करता येतो.

गरोदरपणात पाचव्या महिन्यापर्यंत करता येतो.

आई वडील हयात असतांना करता येतो.

अडचणींच्या वेळी ८-९ वर्षांचे मुलाकडूनही करून घेता येतो.

कुटुंबातील मृत्यनंतर अगर विवाह, मुंज अशा शुभ कार्यानंतर एक वर्ष हा विधी करायचा नसतो.

पण गंभीर प्रसंगात तो संवत्सर अगर अयन बदलल्यासही करता येतो.

पंचमहायज्ञ, हिरण्यदान, तिर्थश्राध्द, चटश्राध्द, भरणीश्राध्द, नांदीश्राध्द, मातामहश्राध्द त्रिपींडी, सपींड श्राध्द, एकाद्दिट श्राध्द :- चौथ्या पिढीला सुतक तुटते. विटाळ, अशौच, सुतक, वृध्दी (बाळांतीन) कालावधी संपल्यावर श्राध्द करावे. तिथी चतुर्थी व एकादशीस श्राध्द आल्यास कोरडा सिधा द्यावा. व त्यानंतर शुध्ददिनी श्राध्द विधी करावा. मासीक श्राध्द झाल्यावर साडे अकाराव्या महिन्यात वर्षश्राध्द करावे.

त्र्यंबकेश्वर, मातृगया, पितृगया, बद्रीकेदार, पुष्कर तीर्थ, ब्रह्मकपाल येथे श्राध्द विधी केले जातात.

ब्रह्मचारी, ऋषी, निसंतान, लहान वयात मरण, हत्या, गर्भपात, यांचे सुध्दा श्राध्द त्या त्या नात्यातील व्यक्तींनी किंवा शिष्यांनी त्या त्या तिथीस श्राध्द विधी करावा.

हरवलेली व्यक्ती व मृत शरीर न सापडल्यास १२ वर्षांनी श्राध्द विधी करावा.

**महालयानंतर सुर्य वृश्चिकेस जाईपर्यंत कोणत्याही एका किंवा अनेक तिथींना श्राध्द करता येते.**

स्त्रीचा शाप सात पिढ्या, पुरूषाचा शाप तीन पिढ्या चालतो.

त्र्यंबकेश्वर येथे तीन पिढ्याचा, बद्रीनाथ येथे सात पिढ्यांचा व पितृगया येथे २१ पिढ्यांचा दोष जातो.

भावकीतील सुकती व्यक्तीचे वर्षश्राध्द झाल्यावर नागबळी व मातृगया विधी करता येतो. ज्यांना नागबळी करता येत नसेल त्यांनी नारायणबळी विधी करावा.

संतती प्राप्तीसाठी पंचमी तिथीला नारायण नागबळी व मातृगया विधी करावा.

पत्नीने माहेरुन आणलेल्या पितृदोषाचे निवारण मातृगया (गुजरात) येथील श्राध्दविधीने होते.
**पितृपक्षात पितरांचा निवास पुत्राच्या घरी असतो.(या मुळे त्र्यंबकेश्वर येथे किंवा मातृगया येथे पितृपक्षात श्राध्द विधी करु नये)**

घरचे श्राध्द विधी स्वतःच करावयाचे असतात. सुरवातीस मंत्रोच्चारासाठी ब्राम्हणाला बोलावले तरी चालेल.

# विधी नंतर काय करावे ?

**हा विधी पूर्ण झाल्यावर कुठल्या देवास, तीर्थास न जाता, कुण्या मित्रा - नातेवाईकाकडे न थांबता, त्यांचे काही न खाता (परान्न न घेता) सरळ घरी जावुन घरचेच जेवायचे असते तरच फलप्राप्ती होते नाहीतर ज्याच्याकडे अन्नग्रहण केले जाईल त्याला सर्व पुण्य दान होते.**

**विधीनंतर सात महिन्यात सात पारायणे श्री गुरूचरित्र, नैमित्तीक श्राद्ध विधी, पंचमहायज्ञ, हिरण्यदान, सूर्यमंत्र व १ वेळा आदित्य हृदय करावे कारण सूर्योपासना पितृदोषाचे निरसन करते. सहा महिन्यात सव्वा लाख गायत्री एक प्रणव, सव्वा लाख महामृत्यंजय एक प्रणव, १२ लाख श्री स्वामी समर्थ जप १० टक्के हवनासह करा. एका वर्षात केंव्हाही श्रीमत् भागवत, श्री स्वामी समर्थ नित्य सेवा व दोन्ही वेळ नित्याचे जेवणाचा नैवेद्य अखंड चालू असावा. रोज एक माळ हवन शुद्ध तुपाने गायत्री मंत्राचे करावे.किमान एक वर्ष तरी परान्न वर्ज करावे. एका वर्षात केंव्हाही श्रीमत् भागवत सप्ताह पारायण विधीवत संकल्पाने घरी करावा. पितरांच्या सणावारांना दान धर्म, सज्जनांना अन्नदान, वस्त्र दान इत्यादी करावे. हे सर्व जमलेच नाही तर किमान ७ गुरुचरित्राची पारायणे एक वर्षात करावीत.**

# (अ) कशी मिळते पितरांना मुक्ती अथवा सद्गती ?

*नारायण नागबली या विधिद्ववारे आपण आपल्या जवळील पूण्य पितरांना दान करून त्यांना सद्गति मिळवून देतो.*

## ''भरपूर पुण्यसाठा''

जर आपल्याकडे पुण्याचा साठा भरपूर असेल तर सर्व पितर पूर्णतः तृप्त होतील पण तेव्हा आपल्या जवळचा पुण्यसाठा कदाचित संपलेला असेल व तो पुण्यसाठा कायम ठेवण्यासाठी अगर वाढविण्यासाठी आपल्याला वरील सेवा करावी लागेल.

## ''किरकोळ पुण्यासाठा''

जर आपल्याकडे पुण्याचा साठा किरकोळ प्रमाणात असेल तर सर्व पितर पूर्ण तृप्त होवू शकत नाहीत.

**या विधिद्वारे महाराज आपल्या पितरांना त्यांच्या सद्गतीचे आश्वासन देतात व पितृदोषाची भयानकता कमी करतात.**

विधीहुन आल्यानंतर आपल्याला आपले पुण्य, वरील सेवेद्वारे वाढवून सर्व पितरांना तृप्त करावे लागते त्याच बरोबर स्वत; पुण्याने बलशाली व्हावे लागेल.

प्रत्येक सेवेक-याने हा विधी ५ ते ७ वर्षात एकदा तरी करावा.

## कोठुन मिळते पितरांच्या सद्गतीसाठी किंवा मुक्तीसाठी आवश्यक असलेले पुण्य.?

१) संकल्पयुक्त अनुष्ठाने, पारायणे, जप, सेवा केंद्रातील आरत्या, उत्सवात भाग घेणे, प.पु.गुरुमाऊलींनी वेळोवेळी सांगितलेल्या विशेष सेवेत भाग घेणे म्हणजेच सेवा केंद्रा व्दारे घेतलल्या सर्व सामुदायीक सेवेत भाग घेणे, ग्राम अभियानात भाग घेणे, आई वडीलाची भरपूर सेवा करणे, त्यांना सुख देणे, आपल्या पाशी असलेले धन जर आपण समाजाच्या सेवेसाठी उपयोगात आणले तर भरपूर पुण्य संचय होवू शकतो. ह्या पुण्याचा वापर पितरांना दान

करण्यासाठी होवू शकतो. उदा.गरजू लोकांना अन्न वस्त्र निवारा, औषधी पुरविणे, आध्यात्मिक स्थळांच्या उभारणीसाठी मदत करणे इत्यादी.

२) स्वामींना सर्वात प्रिय आहे **''हयात असलेल्या आई-वडील, आजोबा-आजी, यांची सेवा म्हणजे त्यांना भरपूर सुख देणे.''** या सेवेव्दारे जो पुण्य संचय होतो त्या पुण्य संचयाचा उपयोग स्वामी महाराज '' वर गेलेल्या '' पितरांच्या सद्गतीसाठी , मुक्तीसाठी करतात.

# उपाय पितृदोष मुक्तीसाठी

१) रोज पंचमहायज्ञ
२) रोज स्नानानंतर पितरांची उपासना, पितृस्तुती, पितृसुक्तपाठ पठण, हवन व नंतर देव पुजा.
३) रोज सुर्याच्या विविध उपासना, गायत्री मंत्राची किमान एक माळ रोज.
४) पितरांच्या सणावारांना दान धर्म व सेवा केंद्रात सांगितले जाणारे विविध उपाय.
५) पितरांच्या तिथीला घरच्या घरी करावयाची नैमित्यीक श्राध्दे.
६) विविध तिर्थक्षेत्राला करावयाचे विधी.
७) नारायण नागबळी, त्रिपिंडी, मातृगया येथील काम्य श्राध्दे.
८) पिंपळाच्या झाडाचे वृक्षारोपण.
९) श्रीमद भागवत ग्रंथाची पारायणे. तसेच गुरुचरित्रे , नवनाथ पारायणेही सांगीतली जातात.
१०) पिंपळाच्या झाडाची ४१ दिवसाची सेवा.
११) आमावस्यच्या विविध सेवा (अ) वाहत्या पाण्यात कोळसा वाहणे. (ब) **'' मध्व सोमास्या धिना मदाय प्रत्नो--- ''** ह्या मंत्राचा वापर करुन पितरांना नैवद्य दाखवणे.
१२) पितृस्त्रोत्र, पितृसुक्त, बाह्यशांती सुक्त, वास्तुच्या नैऋत्य दिशेस, दक्षिणेकडे तोंड करुन वाचावे. किंवा बाह्यशांती सुक्ताचे काळेतीळ व तुपाने हवन करावे. हवन करतांना स्वधः म्हणावे स्वाहा म्हणू नये.

# . गायत्री मंत्राव्दारे पितृ दोष निवारण

आपल्या सेवा मार्गात **पितृदोष व पूर्वकर्मदोष निवारणासाठी कुटुंबास ६ महिने ते १ वर्षात ६ लक्ष गायत्री व १२ लक्ष श्री स्वामी समर्थ मंत्र जप** सांगीतला जातो. श्री स्वामी समर्थ मंत्र जपाने गायत्री

साधना सुरक्षितपणे पार पडते. नारायण नागबळी पेक्षाही याची फळे उत्तम मिळतात. पण सुरवातीस प्रखर दोषामुळे त्या कुटुंबावर व घरावर गडद अशुभ छायेचे आवरण असल्यामुळे कुटुंब सदस्यांची जपाचे कार्यक्रमात एकाग्रता होत नाही. दिर्घ काळ जपास बसणे शक्य होत नाही व अशुभ शक्तीही जपात अनेक अडथळे निर्माण करतात. म्हणून प्रथम नारायण नागबळी हा विधी सांगीतला जातो. त्यामुळे कुटुंबावरील गडद अशुभ छायेचे आवरण सौम्य होवून, कुटुंबात जप कार्यक्रम करण्यात उत्साह निर्माण होतो.

घराण्याच्या पूर्व दोषांचा व व्यक्तीगत कुकर्माच्या दोषांचा परिहार हे गायत्रीसाधनेचे क्रमांक १ चे फळ आहे. कारण त्या शिवाय साधक अध्यात्म मार्गावर पुढे वाटचाल करु शकत नाही.

*अधिक माहितीसाठी केंद्रात प्रश्नोत्तर कर्त्याकडे संपर्क साधावा*




# (अ) सामान्य फलश्रुती

**१) शत्रुंचा त्रास कमी होतो व त्यांचा त्रास संपविण्याचे मार्ग सापडतात.**

२) बाहेर बाधा अगर अदृश्य शक्तींचा त्रास कमी होतो व त्यांचा त्रास संपविण्याचे मार्ग सापडतात.

३) नात्यागोत्यांचे संबंध सुधारतात.

४) आंतर जातीय विवाह टळतात.

५) घरातील नास्तिक वातावरण बदलून आस्तिक वातावरण निर्माण होते.

**६) मांसाहाराची ओढ नाहीशी होते.**

७) समाजातील स्थान सन्मानाचे राहते.

८) घरात व घरावर असलेली प्रेतात्म्याची छाया-दबाव नाहीसा होतो.

९) मुलांच्या बाबतीत अनेक प्रकारे शुभ घटना घडतात.

***१०) ज्यांना पुत्रसंतती होत नाही त्यांना ती होवू शकते.***

११) मुलांचे आयुष्यमान व आरोग्य सुधारते व शिक्षणात प्रगती होते.

१२) वर्ष वाया जाण्याचे प्रसंग येत नाहीत.

१३) तेवढयात अभ्यासात १५ टक्के पर्यंत जास्त गुण पडू शकतात.

१४) अपेक्षित चांगल्या कोर्सला प्रवेश मिळणे सुलभ जाते.
१५) प्रखर पितृदोषाने नित्य आजारी, अपंग अशी मुले जन्माला येतात हे टळते.

# (ब) धंदा-नोकरी- व्यवसाय- शेती

ज्या अपत्यांच्या बाबतीत नोकरींच्या समस्या असतील त्यांनाही योग्य नोकरीचा मार्ग सापडतो. त्यांचा धंदा असल्यास त्यांच्या धंद्यातील अडचणी निवारण होवून प्रगती होते. घरात बरकत, पुरवठा राहतो. कर्जफेडीचे मार्ग उपलब्ध होतात व यथावकाश ऋणमुक्तता होते.

धंद्यात आर्थिकदृष्टया प्रगतीशील घटना घडून, योग्य मार्ग सापडून, योग्य निर्णय घेतले जातात. शेतीचे उत्पन्न जास्त हाती पडते. नोकरी व्यवसायात काही वेळा जो बॉसचा व सहकारी कर्मचा-यांचा त्रास असतो तो एकदम कमी होतो अगर पूर्ण नाहिसाही होतो, अगर तशी परिस्थिती बदली इ.द्वारे निर्माण होते. अडचणीच्या ठिकाणी झालेली बदली सहज प्रयत्नानेही सोईस्कर ठिकाणी होवू शकते. अडलेली बढतीही मार्गी लागते व नौकरीत ठपका येण्याचे प्रसंग टळू शकतात. निलंबीत कर्मचा-यालाही पुन्हा नौकरीवर रूजू होण्याचे मार्ग उपलब्ध होवू शकतात. **एकूण उदरनिर्वाहाच्या साधन संपदेतही सुलभता व मुबलकता निर्माण होते.**

## (क) ''मानसिक व शारीरिक आजारा मध्ये NNB केल्यानंतर होणारे फायदे''

**१) माणसाला होणा-या आजारां पैकी अंदाजे ८० टक्के आजार पितृदोषामुळे होतात. शारीरिक आजार तसे २० टक्के दरम्यानच असतात. तेव्हा हे आजारही टळतात.**
२) डॉक्टरांना निदान न होणारे अगर कायमचे मागे लागलेले आजार कमी होतात व कालांतराने पूर्णत; नाहीसे होतात (औषधे घेऊन व सेवा करून)
३) अनाठायी व नित्य आजार पणात होणारा खर्च टळून आर्थिक बाजू सुधारते.
४) गर्भपाताचे प्रसंग टळतात.
५) मुलींच्या मासिक पाळितील अनियमितता जावून नियमितपणा येतो.
६) कुटुंबातील व्यसनाधीन व्यक्तींने व्यसन कमी होते व व्यसन पूर्णपणे सुटण्याची मानसिकता महाराज निर्माण करतात.
७) कुटंबातील व्यक्तींचा तापट व हेकट स्वभाव कमी होतो अगर पुढे आणखी ''सेवाकार्यक्रम'' करून पूर्णपणे नाहिसाही होतो.
८) रात्री शांत झोप लागते.

९) भयानक स्वप्नांचा त्रास नाहीसा होतो.

१०) राहत्या घरी मानसिक शांतता लाभते.

११) अकाल मृत्यु टळतात.

१२) मुले घरातून पळून जाण्याचे प्रसंग टळतात.

१३) कुटुंबातील संबंधित व्यक्तिंची आत्महत्या प्रवृती नाहीशी होते.

१४) संसारातील पतिपत्नीचे वादविवाद, मतभेद एकदमच कमी होतात.

१५) कुटुंबात एकूण सामंजस्याचे वातावरण निर्माण होते.

**१६) महाराजांची सेवा व योग्य कर्म हे दोन्ही समांतर चालले तर यश दूर नाही.कारण की महाराजांच्या सेवेमध्ये ''कर्मदायिनी '' नावाची शक्ती ठसठसून भरलेली आहे.**

**''जरी एखादा सेवेकरी नियमबाहय कामामध्ये व्यस्त असेल परंतू महाराजांची ''विशेष कामासाठी घेतलेली विशेष सेवा '' अत्यंत निष्ठेने करत असेल तर महाराज त्याचे काम करतातच त्याशिवाय त्याला नियमबाहय कामापासून परावृत्तही करतात.''**

# (ड) विवाह आणि पितृदोष

१) मुलामुलींच्या विवाहातील अडचणी दूर होऊन विवाह जमून निर्विघ्न पार पडतात.

**२) कारण विवाहाचे बाबतीत ''प्रखर पितृदोष'' हा प्रथम अडथळा पितरांचा व नंतर कुलदेवीचा राहतो.**

**३) पितृदोष निवारणाने विवाह अपेक्षेपेक्षाही सुस्थळी व कमी खर्चात होवून जातो.**

*४)* एखादया सालस, सुंदर, सुशिक्षित मुलीचे, मातापित्यांची आर्थिक सुविधा असुनही, आटोकाट प्रयत्नानेही लग्न अडून राहते. कुलदेवीची खुप सेवा करूनही मार्ग सापडत नाही. **अशा वेळी मुख्यतः पितरांचा असलेला दोष नारायण नागबळीद्वारा निरसन करताच अपेक्षेपेक्षाही उत्तम स्थळ लाभून योग्य खर्चात दीड दोन महिन्याच्या आत विवाह होतो**. सर्वसामान्य मुलींचेही आर्थिक अडचणी असतानाही या विधिनंतर तात्काळ विवाह होतात.

***हे या मार्गातील नित्याचे अनुभव आहेत.***

५) मुलांचे बाबतीतही असे घडू शकते. उलट मुलांचे बाबत लग्न जरी अडले नाही तरी पितृदोषामुळे पत्नी अत्यंत दोषी घराण्यातील अगर असंस्कृत, विकृत मनोवृत्तीची भेटून संसारीक जीवन पूर्ण उध्वस्त होते व लगेच घटस्फोट प्रकरण निर्माण होते.

६) प्रखर पितृदोषामुळे नांदत्या मुली माहेरी येऊन कायमच्या पडतात.

७) पितृदोष निवारण्यापूर्वी अयोग्य ठिकाणी झालेल्या विवाहाचे बाबतीतही या विधिनंतर अपेक्षीत घटस्फोटही सुलभ होतो.अशा प्रकारे या विधिने मुलामुलींचे वैवाहिक जीवन सुखी होऊ शकते.

**८) तेंव्हा अशुभ घटना घडून गेल्यावर त्याची सावरासावर करण्यापेक्षा सावधानता बाळगुन पितृदोषाचे निवारण करणे हे केंव्हाही शहाणपणाचे व लाभदायक ठरते.**

# समस्यांचे उगमस्थान

**सर्व समस्या खाली दिलेल्या प्रकारातून मुख्यत्वे निर्माण होतात-**

**१) प्रारब्ध**

**२) पितृ दोष**

**३) कुलदेवता व कुलदैवत यांची योग्य प्रकारे सेवा न झाल्यामुळे निर्माण होणारे दोष**

**४) वास्तू दोष,**

**५) बाहेरील बाधा**

**६) देव- देव्हारा**

**७) मानवी स्वभाव विकृती.**

**८. शाप व तळतळाट**

## १)प्रारब्ध :-

१) केवळ चांगल्या संगतीने सर्वसामान्य प्रारब्धाचे भोग विवेक जागृत ठेवून टाळता येतात. व त्याची तीव्रता कमी करता येते.

२) **जप, तप, अनुष्ठान, पारायण, वेगवेगळया प्रकारच्या काम्य सेवा या व्दारे तीव्रता प्रारब्धाचे भोग कमी करता येतात किंवा संपूर्णपणे नष्टही करता येतात.**

३) सेवेकरी जर सतत सेवेमध्ये अत्यंत निष्ठेने राहिला तर, केवळ आणि केवळ तिसऱ्या प्रकारात मोडणारे सद्‌गुरु स्वतःच्या ताकदीने अटळ प्रारब्धात बदल करुन स्वतः त्या सेवेकऱ्याचे नविन प्रारब्ध निर्माण करु शकतात. (अशा प्रकारचे सद्‌गुरु कोण आहेत. हे सुज्ञ वाचकांनी ओळखलेच असेल!)

# २)मानवी स्वभाव विकृती

बहुतांश समस्या या मानवाच्या स्वभाव विकृती मुळे निर्माण झालेल्या असतात. मानवाने योग्य विचाराने, तर्कशुध्द विवेकाने व ज्ञानयुक्त अंतःकरणाने वागले तर मुळात अनेक मानवी समस्या निर्माण होवू शकणार नाहीत.

मानवाचा चुकीचा व्यक्तीगत अहंकार, चुकीचा सामाजिक अहंकार, चुकीचा धार्मीक अहंकार, चुकीचा ध्येयवाद हीच कारणे सर्व मानवी समस्यांचे मुळ आहेत.

## ३)कुलदेवता व कुलदैवत यांची योग्य प्रकारे सेवा न झाल्यामुळे निर्माण होणारे दोष

१) आपण वर्षातून एकदा तरी कुलदेवता व कुलदैवत यांच्या मुळ स्थानी जावून योग्य तो मान सन्मान करावा. :

२) कुलधर्म व कुलाचार यांचे घरातील सर्वांनी व्यवस्थितपणे पालन करावे.

३) **दुर्गा सप्तशती व मल्हारी सप्तशती चे प्रत्येकी १०८ पाठ वर्षभरात कुटुंबियांनी मिळून करावे.**

४) केंद्रातील प्रश्नोत्तर विभागाला भेट देवून कुलदेवता व कुलदैवत यांच्या विषयी योग्य ती व अधिक माहिती जाणून घ्यावी.

# ४)बाहेरील बाधा

१) आपण प्रश्नोत्तर कर्त्या कडुन आपल्याला बाहेरील बाधा आहे की नाही हे निश्चित करुन घ्यावे.

२) त्यानंतर प्रश्नोत्तर कर्त्याने दिलेली सेवा योग्य प्रकारे करुन बाहेरील बाधांवर विजय मिळवावा.

# ५)वास्तुदोष

१) वास्तुशास्त्रा बद्दलची विस्तृत माहिती "ज्ञानदान भाग ३ "मध्ये प.पु.गुरु माऊलींच्या आशिर्वादाने सविस्तरपणे दिलेली आहे.

२) वास्तु ही घर, बंगला, ऑफिस, फॅक्टरी , कारखाना, देऊळ, केंद्र कोणतीही असू शकते.

**३) वास्तुदोषाचे संपूर्णपणे निवारण करावयाचे असेल तर सर्व प्रथम पितृ दोषाचे निवारण करणे अत्यंत आवश्यक ठरते.**

४) केवळ आणि केवळ पितरांच्या शुभ आशिर्वादानेच आपल्याला उत्तम वास्तूची प्राप्ती होते.

५) प्रत्येक सेवा केंद्रात वास्तु दोष निवारण करण्यासाठी वास्तुतज्ञांची नियुक्ती करण्यात आलेली आहे.त्यांच्या सोबत विस्तृत चर्चा करुन आपल्या वास्तूचे दोष निवारण करुन घ्यावेत.

६) आपल्या मार्गात तोडफोड न करता वास्तदोष निवारण करता येतो.

७) जन्मकुंडली चतुर्थ स्थानात मंगळ- राहू, शनी-राहू असे योग असतील तर चतुर्थेश ६,८,१२ स्थानात पाप कर्तरीत असेल, अगर कुंडलीत कालसर्प योग असेल तर वास्तुदोष निर्माण होतो, म्हणजे दुषित वास्तुत राहण्याचे योग्य येतात.

८) वास्तुत शुभ बदल म्हणजे प्रारब्धात शुभ बदल हे केवळ विचाराने, बुध्दीने घडवून आणता येत नाही. **त्यासाठी उपासना मार्गात राहून अनेका-नेक प्रारब्ध दोषाचे यथाकाल निवारण, सौम्यताकरण होवून निश्चित वास्तुनिवास योग्य काळी लाभू शकतो.**

९) जेवढे प्रारब्धातील शुभत्वाचे प्रमाण जास्त त्या प्रमाणात निवासाची वास्तू देखील जास्तीत जास्त चांगली लाभते. हे पायाभुत मुळ तत्व दृष्टीआड करणे योग्य नाही.

**१०) वास्तुशास्त्रा प्रमाणे गृहरचना असेल पण घरात श्री स्वामी समर्थ महाराजांची सेवा नसेल तर वास्तुशास्त्राची फक्त ३० टक्के फळे आपल्याला मिळतील.**

११) वास्तुदोषाचा पितृदोषाशी घनिष्ट संबंध असल्यामुळे प्रखर पितृदोषी कुटुंबास प्रखर वास्तुदोषाचा निवास लाभतो. तेंव्हा वास्तुदोष नसलेल्या वास्तुची अपेक्षा करणाऱ्या कुटुंबाने प्रथम त्यांच्या पितृदोषाचे निवारण सर्वप्रथम करुन घेणे.

**६) देव- देव्हारा** ⟶ देव-देव्हारा कसा असावा हे प्रश्नोत्तर कर्त्याकडून समजून घ्यावे.

# संतांची परखड सत्य विधाने.

१. जिवनमुक्त संतांनी निरिक्षण केलेल्या, अनुभवलेल्या निखळ सत्य घटना, अनुभुत अशी परखड सत्य विधाने हे केवळ वाचण्यासाठी नसून सेवेक-यांनी त्यावर खोल आत्मचिंतन, आत्मपरिक्षण व आत्मविश्लेषण करावे अशी अपेक्षा आहे.
२. सेवेकऱ्यांनी स्वार्थी असणे हा भगवान श्री स्वामी समर्थांच्या सेवामार्गात अपराधच गणला जातो.
३. सतत खोटे बोलत राहणे , दुस-याला मुर्ख बनवत राहणे, फसविणे यासाठी सेवेकरी भगवान श्री स्वामी समर्थांच्या दरबारात कठोर शिक्षेला पात्र ठरतो.
४. आत एक व बाहेर एक अशा प्रकारे दुटप्पी वागणाऱ्या सेवेकऱ्यांचा या सेवा मार्गात अखंड राहूनही परलोक बिघडण्याची शक्यता राहते.
५. **जे कंजुस लोक दान धर्म, परोपकार करत नाहीत व ज्यांची पुण्याई संपलेली आहे अशांनाच पिशाच्च बाधा होतात.**
६. घरातील कर्ता पुरुष किंवा स्त्री पिशाच्च बाधेने मृत्यु पावल्यास त्या घराला अनेक वर्षे दारिद्र्य व अनेक गंभीर समस्या त्रास देतात.
७. राजकारणी लोकांची स्वार्थी वृत्ती, अन्याय, अधिकार प्रवृत्ती यामुळे समाजाचे सामुहिक प्रारब्ध दुषित होऊन जनसामान्यांना भुकंप, अवर्षण, जलप्रलय, युध्द अशा नैसर्गिक आपत्तींना सामोरे जावे लागते.
८. या भुतलावर मानव, मानवेत्तर प्राणी, जडवस्तू या सर्वांना प्रारब्ध असते.माणसाला आपले ऋण फेडण्यासाठी मृत्युनंतर मनुष्येत्तर प्राण्यात जन्म घ्यावा लागतो.
९. माणूस जेंव्हा दुसऱ्यासाठी आनंददायक, सृजनात्मक कर्म करतो तेंव्हा त्या माणसाच्या आत्म्याची उन्नती होते. माणूस जेंव्हा दुसऱ्यासाठी विघातक, दुःख दायक कर्म करतो तेंव्हा त्या माणसाच्या आत्म्याची पूर्णपणे अधोगती होते.
१०. इर्षा, व्देष, मत्सर, अयोग्य हुकुमत, सत्तेचा लोभ, हिंसक प्रवृत्ती मानवास पूर्ण अधोगतीस म्हणजे मृत्युनंतर नरकात नेते.

# नरक लोकाचे निरिक्षण.

१. एका ज्ञानी आत्म्याने संपूर्ण नरक लोकाचे निरिक्षणात्मक भ्रमंती करुन खालील निवेदन दिले आहे. प्रत्येक नरकात अनेक आत्मे हजारो वर्षे खितपत पडलेले आहेत. हजारो वर्षांपूर्वी संपूर्ण आशियाखंडावर राज्य करीत असलेले आत्मेही त्या नरकात अजूनही खितपत पडलेले आहेत. तसेच अनेक राज घराण्यातील सत्ताधारी, अधिकारी, जमीनदान, धनाढ्य सावकार, असंख्य वतनदार, स्वार्थी , लोभी, कंजुष असे असंख्य आत्मे या नरकात हजारो वर्षे शिक्षा भोगत आहेत. त्यांच्या यातनांना अंत नाही. काही आत्मे तर १०००० वर्षा पेक्षा अधिक काळ या नरकात कुजत आहेत.

२. **नरकातील या आत्म्यांची शिक्षा संपल्यानंतर त्यांना ओझे वाहणाऱ्या जनावरांचे जन्म मिळतील नंतर त्यांना अत्यंत दरिद्री कुटुंबात जन्माला घातले जाईल.काही आत्म्यांना अपंग, रोगी, कुरुप करुन जन्माला घातले जाईल. तर काहींना जन्मल्यानंतर लगेच महारोग होईल.**

३. काही आत्मे भिकारी म्हणून जन्माला घातले जातील.काही वेळा सामान्य माणसाकडून अक्षम्य व गंभीर चुका घडतात व त्याचे परिणाम पुढील पिढ्यांना भोगायला लागतात.

४. जे लोक समाज कंटक, गुंडगीरी करणारे, खुन करणारे, सज्जनांना त्रास देणारे असतात. ते मृत्युंनंतर हजारो वर्षे नरक यातना भोगतात व त्यांना पुन्हा मनुष्य योनीत पाठवले जात नाही.

५. **अलिकडे १०००० आत्म्यातील फक्त एक आत्मा स्वर्ग लोकात जातो व बाकीचे पिशाच्च सृष्टीत जातात कारण सर्वजण सत्ता, संपत्ती, सौंदर्य, सामर्थ्य यांच्या मागे लागले आहेत.**

६. मोठेपणाचे, सत्तेची, अधिकाराची हाव अध्यात्म्याच्या प्रगतीत सर्वात मोठा अडथळा होय.

७. परोपकारी माणसाला कुठल्याही गोष्टीची कमतरता पडत नाही. वातावरणातील अदृष्य देव-देवता त्याला सदैव मदत करतात. परोपकार, दानधर्म न केल्यास अनेक समस्या जन्माला येतात. परोपकार पुण्यकारक असून दुसऱ्याला दिलेल्या मानसिक यातनांची तर खुपच कटु फळे मिळतात.

८. क्षणोक्षणी पुण्याई खर्च होत राहते व पुण्याई न वाढविल्यास, ईश्वर भक्ती, दानधर्म न केल्यास शेवटी दारिद्र्याची अवस्था येते. माणसाच्या प्रत्येक श्वासाबरोबर त्याचे आयुष्य कमी होत असते.त्याच प्रमाणे सुखाच्या प्रत्येक घासा बरोबर माणसाची पुण्याईपण कमी होत असते.

**९. ईश्वर सेवेची पुण्याई सुध्दा अशी सारखी खर्च होते. तेंव्हा आम्ही एवढी सेवा, उपासना करतो तरी आमचे काम का होत नाही, असे विचार करतांना आपली उपासना इतर किती ठिकाणी खर्ची घातली याचाही सुक्ष्म विचार सेवेकऱ्यांनी करायला पाहिजे.(ज्ञानदान भाग ३ मध्ये पान क्र. १५० वरील राम नामाची गोष्ट वाचावी.)**

१०. एखादा मनुष्य जर खुप दुष्ट असेल तर त्याची पुण्याई लवकर संपवावी म्हणून वातावरणातील काही विशिष्ट शक्ती त्या व्यक्तीच्या हातून अधिकाधिक दुष्टकर्मे घडवीतात व त्याची पुण्याई संपवितात कारण पुण्याई संपल्या शिवाय त्याला शिक्षा करता येत नाही.

**११. पुण्याई असेल तर कचराही सोन्याच्या भावाने विकला जातो. व पुण्याई संपली की, सोनेही कचऱ्याच्या भावाने विकावे लागते. म्हणून नित्य पुण्याचा साठा दानधर्म, परोपकार व्दारा वाढवत राहिले पाहिजे.**

१२. **आरोग्य - शांती - समाधान - आनंद- यश** या सर्व गोष्टी पुण्याईने प्राप्त होतात.

१३. पुण्याई संपताच क्लेश - दुःख - संकटे- दारिद्र्य -अहंकार- व्देष - असुया माणसाला ग्रासुन टाकतात.

**१) या सेवा मार्गाचे कार्य सामान्य भविष्य कथनात्मक नसुन अति खडतर प्रारब्धावर मात कशी करावयाची,जन्मस्थग्रह, कुयोगाचे निवारण अगर तिव्रता कशी कमी करायची इत्यादी गोष्टी बाबत मार्गदर्शन केले जाते.**

**२) गुरुचरित्रा समान चमत्कार या मार्गात पदोपदी, क्षणा-क्षणाला '' स्वामी महाराज '' घडवत आहेत.**

**३) तीन अध्याय, ११ माळीची सेवा असल्या शिवाय विशेष कामासाठी घेतलेली विशेष सेवा फलद्रुप होणे जवळ-जवळ अशक्यच!**

**४) एकदा समस्या निवारण्यासाठी कार्यक्रम घेतल्यानंतर ती समस्या सुटल्यानंतरही त्या सेवेकऱ्याने या सेवामार्गात नित्य रहावे. कुटुंबातील प्रत्येकाने स्वामींची नित्य सेवा घरी व देव्हाऱ्यात करावी. जवळच्या सेवा केंद्रातील आरत्या, उत्सव इत्यादी गोष्टींना हजर राहून स्वामी कार्यात नित्य संपर्कात रहावे. त्यामुळे भविष्यात येणारे संकट, आपत्ती महाराज न कळत टाळून सेवेकऱ्यांच्या कुटुंबाचे सर्वार्थाने रक्षण करतात यची अखंड गंभीर जाणीव प्रत्येक सेवेकऱ्याने ठेवावी.**

## संदेश प.पु.गुरु माऊलींचा - सेवेव्दारे सर्व दोष निवारण

# ''कोठे, कोठे होतो सामुहिक सेवेचा उपयोग''

**१) ''श्री गुरूचरित्र'' अध्याय ३६ मध्ये १३८ वी ओवी :-**
**महापातकादि दोषासी ! कोटी जप करावा परियेसी !**

**जी जी कामना इच्छिसी ! त्वरीत होय अवधारा ।।१३८।।**

**१) पूर्व कर्म, पूर्व प्रारब्ध, जन्मजन्मांतरीचे पाप, प्रखर पितृदोष निवारण्यासाठी ''कोटी-कोटी'' गायत्री मंत्राची आवश्यकता असेल तर आजकालच्या धकाधकीच्या जिवनात ते जवळजवळ अशक्यच आहे.**

**२) परंतु प.पु. गुरूमाऊलीनी ''सामुहिक सेवा'' हे अत्यंत उपयोगी व प्रभावी अस्त्र सर्व सेवेक-यांसाठी बहाल केले आहे.**

३) पाप किंवा दोष कितीही भयंकर का असेना, ते पूर्णपणे जाळून टाकण्यास भरपुर पुण्याचा साठा हया ''सामुहिक सेवेद्वारे'' उपलब्ध होवू शकतो.

४) जर एका वेळेस **५० सेवेकरी** ''श्री स्वामी समर्थ'' मंत्र १ माळ जप करीत असतील तर प्रत्येक सेवेक-याच्या खात्यात त्या २ ते ३ मिनिटात **५० माळा** जप म्हणजे **५००० जप** होतो.

५) खडतर प्रारब्ध असो की प्रखर पितृ दोष , दोन्हीही निवारण करता येते. परंतू यासाठी प्रचंड सेवेचीच आवश्यकता असते जी सर्व केंद्रा मध्ये रोज विनामुल्य करवून घेतली जाते. कुटुंबातील सदस्यांनी आपआपला वाटा वेळेनुसार उचलावा व कुटुंबियाचे सर्व प्रश्न सोडवून घ्यावेत.

## ६) श्री दत्त चौक, केंद्र नासिक येथील अनुभव :-

एका सदग्रहस्थाला प.पु. गुरूमाऊलींनी NNB हा विधी करण्यास सांगितले. ''या ना त्या कारणाने २-३ वेळा तो, ती सेवा चालू असताना परत आला किंबहुना त्याला परतावेच लागले. निराश होऊन तो जेव्हा प.पु.गुरूमाऊलींकडे गेला, तेव्हा केंद्राच्या उत्कर्षासाठी दत्त चौक नाशिक येथील केंद्रात ''बटुक भैरव'' सहस्रानामाचे पाठ व हवन चालू होते. प.पु.गुरूमाऊलींनी त्याला त्या सेवेत भाग घेण्यास सांगितले. दोन महिन्याच्या सेवेनंतर त्याचा NNB हा विधी पूर्ण झाला व त्याला त्याच्या इच्छित गोष्टी माऊलींच्या कृपा आशिर्वादाने मिळाल्या.

**।। श्री स्वामी समर्थ चरणार्पणमस्तु ।।**